**एतदर्थ मंडळामार्फत घेण्यात येणाऱ्या परीक्षेसाठी नेमण्यात येणाऱ्या प्राश्निक/ परीक्षक व अन्य कर्मचारी यांच्या मानधनात वाढ करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः भासंमा-२०१५/प्र.क्र.१३/भाषा-२,**
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १५ एप्रिल, २०१७

**वाचा:-** सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एलएनजी-२००६/१००६/प्र.क्र.९३/०६/२०-ब, दि.१.१.२००९ व समक्रमांकाचे दि.२१.३.२००९ चे शुद्धीपत्रक

**शासन निर्णय:-**

भाषा संचालनालयांतर्गत कार्यरत असलेल्या एतदर्थ मंडळामार्फत मराठी भाषा, हिंदी भाषा, मराठी टंकलेखन व मराठी लघुलेखन परीक्षा आयोजित केल्या जातात. सदर परीक्षांसाठी नेमण्यात येणाऱ्या प्राश्निक/परीक्षक/नियामक/परीक्षाचालक-नि-ज्येष्ठ पर्यवेक्षक, कनिष्ठ पर्यवेक्षक, मुद्रित तपासणीस, लिपिक, चपराशी, पाणीवाला व अन्य कर्मचारी यांना संदर्भाधीन शासन निर्णयाप्रमाणे मानधन देण्यात येते. तथापि सध्याची वाढलेली महागाई लक्षात घेता सदर परीक्षांसाठी देण्यात येणा-या मानधनात सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार वाढ करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

यासाठी होणारा खर्च भाषा संचालनालयाच्या त्या-त्या वित्तिय वर्षात मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर आदेश वित्त विभागाच्या अनौसं.क्र.८१२/१६/व्यय-४ तसेच अनौसं-५/१७/सेवा-६, दि.५.४.२०१७ अन्वये प्राप्त मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१७१५२५३०२९३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Leena Vivek Dhuru

Digitally signed by Leena Vivek Dhuru
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Marathi Bhasha, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=269247ae44c2ad89fc0cbab5ac68fe64bca5544d860f22f8bb39204bee1090c6, cn=Leena Vivek Dhuru
Date: 2017.04.17 15:35:09 +05'30'

**( लिना वि.धुरू )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
४. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, विधानभवन, मुंबई
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
६. महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
७. महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१०. मा.मंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्य अधिकारी
११. अवर सचिव (व्यय-४/सेवा-६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. भाषा संचालक, भाषा संचालनालय, वांद्रे (पूर्व), मुंबई
१३. सर्व विभागीय सहायक भाषा संचालक, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नवी मुंबई
१४. निवड नस्ती (भाषा-२)

शासन निर्णय दि.१५.४.२०१७ सोबतचे विवरणपत्र

| अ.क्र. | पदनाम | भाषा संचालनालयाचे सध्याचे मानधनाचे दर | सुधारीत दर |
|---|---|---|---|
| १ | केंद्रप्रमुख (परिक्षाचालक नि-ज्येष्ठ पर्यवेक्षक) | प्रत्येक सत्रास रू.६०/- किंवा प्रतिदिनी रू.१२०/- | प्रत्येक सत्रास रू.७५०/- किंवा प्रतिदिनी रू.७५०/- |
| २ | कनिष्ठ पर्यवेक्षक (पर्यवेक्षक/ समवेक्षक) | प्रत्येक सत्रास रू.५०/- किंवा प्रतिदिनी रू.१००/- | परीक्षा एका सत्राची असेल तर रू.३५०/- किंवा प्रतिदिनी रू.५५०/- |
| ३ | लिपिक | प्रत्येक सत्रास रू.४०/- किंवा प्रतिदिनी रू.८०/- | प्रत्येक सत्रास रू.३००/- किंवा प्रतिदिनी रू.३००/- |
| ४ | मुद्रित तपासणीस | प्रत्येक प्रश्नपत्रिकेस रू.६०/- | प्रत्येक प्रश्नपत्रिकेस रू.१२५/- |
| ५ | प्रपाठयवाचक (लघुलेखन परीक्षा) | परीक्षार्थ्यांच्या प्रत्येक गटाकरीता रू.७०/-(१० ते १५ जणांच्या गटाला) दोन परिच्छेद वाचनाकरीता | परीक्षार्थ्यांच्या प्रत्येक गटाकरीता रू.१५०/- (१० ते १५ जणांच्या गटाला) दोन परिच्छेद वाचनाकरीता |
| ६ | चतुर्थश्रेणी कर्मचारी | प्रत्येक सत्रास रू.२५/- किंवा प्रतिदिनी रू.५०/- | प्रत्येक सत्रास रू.२५०/- किंवा प्रतिदिनी रू.२५०/- |
| ७ | पाणी देण्यासाठी व इतर | प्रत्येक सत्रास रू.२०/- किंवा प्रतिदिनी रू.४०/- | प्रत्येक सत्रास रू.२००/- किंवा प्रतिदिनी रू.२००/- |
| ८ | प्राश्निक | प्रत्येक प्रश्नपत्रिकेस रू.२५०/- प्रमाणे तसेच पावत्या अगर प्रमाणपत्रावर आधारीत प्रत्यक्ष टपालखर्च व आकस्मिक खर्च | प्रत्येक प्रश्नपत्रिकेस रू.५००/- तसेच प्रमाणपत्रावर आधारीत प्रत्यक्ष टपालखर्च व आकस्मिक खर्च |
| ९ | परीक्षक (लेखी परीक्षा) | प्रत्येक उत्तरपत्रिकेस रू.१०/- प्रमाणे, परंतु किमान रू.१२०/- तसेच पावत्या अगर प्रमाणपत्रावर आधारीत प्रत्यक्ष टपालखर्च व आकस्मिक खर्च | प्रत्येक उत्तरपत्रिकेस रू.३५/- परंतु किमान रू.१२००/- तसेच पावत्या अगर प्रमाणपत्रावर आधारीत प्रत्यक्ष टपालखर्च व आकस्मिक खर्च |
| १० | परीक्षक (तोंडी परीक्षा) | प्रत्येक उमेदवारामागे रू.१०/- प्रमाणे, परंतु किमान रू.८० यापैकी अधिक असेल ते तसेच पावत्या अगर प्रमाणपत्रावर आधारीत प्रत्यक्ष टपालखर्च व आकस्मिक खर्च | प्रत्येक उमेदवारामागे रू.२०/- प्रमाणे, परंतु किमान रू.२००/- यापैकी अधिक असेल ते तसेच पावत्या अगर प्रमाणपत्रावर आधारीत प्रत्यक्ष टपालखर्च व आकस्मिक खर्च |
| ११ | नियामक | नियमन केलेल्या प्रत्येक उत्तरपत्रिकेस रू.१०/- प्रमाणे, परंतु किमान रू.१२०/- तसेच पावत्या अगर प्रमाणपत्रावर आधारीत प्रत्यक्ष टपालखर्च व आकस्मिक खर्च | नियमन केलेल्या प्रत्येक उत्तरपत्रिकेस रू.३५/- परंतु किमान रू.५००/- तसेच पावत्या अगर प्रमाणपत्रावर आधारीत प्रत्यक्ष टपालखर्च व आकस्मिक खर्च |